श्री. विकास एकनाथ जोग, निरीक्षक, वैध मापन शास्त्र गट-ब (राजपत्रित) यांचे पदस्थापितीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न ,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन आदेश क्र. बदली- २०२१ / प्र.क्र. ४७ / ग्रासं-३**
मादाम कामा मार्ग ,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२..
दिनांक - १८ फेब्रुवारी, २०२२

**संदर्भ :-** १) नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांचे कार्यालयीन आदेश क्र. वैमाशा /आस्था-२/ निरीक्षक/ विचौ / २०२१ /९०३, दि. २८.०६.२०२१.
२) शासन आदेश क्रमांक - वैमाशा - २०२१ / प्र.क्र.४७/ ग्रासं-३, दि. १६/१२/२०२१

**शासन आदेश :-**

नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी दि. २८/६/२०२१ च्या आदेशान्वये श्री. जोग, निरीक्षक, वैध मापन शास्त्र हे मांडवी-२ विभाग येथे कार्यरत असताना त्यांना कार्यालयीन गैरशिस्त विनापरवानगी गैरहजेरी व त्यांच्याविरुध्द प्राप्त तक्रारींच्या अनुषंगाने निलंबित केले होते. त्यानंतर संदर्भ क्र. २ येथील शासन आदेशान्वये श्री. विकास जोग, निरीक्षक, वैध मापन शास्त्र, यांचे निलंबन संपुष्टात आणून त्यांना नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुख्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील रिक्त पदावर तात्पुरती पदस्थापना देण्यात आली आहे. श्री. जोग यांच्या नियमित पदस्थापनेबाबत नंतर आदेश निर्गमित करण्यात येतील असे सदर आदेशात नमूद करण्यात आले आहे.

०२. श्री. जोग यांच्या नियमित पदस्थापनेस सक्षम प्राधिकारी यांची मान्यता मिळाली असून त्यांची नियमित पदस्थापना खालीलप्रमाणे त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्र ४ मधील पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-याचे नाव | सध्याच्या पदावर कार्यरत असल्याचे ठिकाण | पदस्थापितीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. वि. ए. जोग | निरीक्षक, वैध मापन शास्त्र, मुख्यालय, मुंबई | निरीक्षक, वैध मापन शास्त्र, विभागीय कार्यालय पुणे येथील रिक्त पदावर |

०३. श्री. जोग, निरीक्षक, वैध मापन शास्त्र यांनी पदस्थापितीचे ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे.. श्री. जोग यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून ग्राह्य धरण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल. तसेच त्यांच्या सेवेचा खंड पडण्याची शक्यता देखिल नाकारता येत नाही, याची जाणीव संबंधीतांना करुन देण्यात येत आहे.

०४.       श्री. जोग यांना पदस्थापनेच्या पदावर रुजू होणेसाठी पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता तसेच इतर अनुषंगिक भत्ते अनुज्ञेय असतील.तसेच नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांना कळविण्यात येते की, संबंधीत निरीक्षकाने पदभार सोडल्याचा व स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहित कालवधीत संबंधीत अधिकारी पदस्थापितीच्या ठिकाणी रुजु न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरीत अवगत करावे, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियंम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार संबंधित अधिका-याचे रेजेचे अर्ज स्वीकारु नयेत / मंजुर करु नयेत.

०५.       सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०२२११२५४२४२१०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHITAL ANAND RAMTEKE

Digitally signed by SHITAL ANAND RAMTEKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=250b23140177f1b91b8d23d0003fea615e62e9fa665cd65cd822d17139dee73b, pseudonym=6E8363396B2786A7F9280A0F6B79E9C7BC0E7B56, serialNumber=7D5A263499F325CA90E9E04FA83D69E04FD5CB75F96BB3FC42610EB9D879192B, cn=SHITAL ANAND RAMTEKE
Date: 2022.02.21 12:57:59 +05'30'

**( शितल रामटेके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. विकास एकनाथ जोग, निरीक्षक, वैध मापन शास्त्र, मुख्यालय, मुंबई.
(नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांचे मार्फत)

**प्रत :-**

१) नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई (यांना आवश्यक त्याकार्यवाही करीता)
२) मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,
३) सचिव ,अन्न ,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक,
४) सहनियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई / पुणे
५) महालेखापाल -१ ) लेखा व अनुज्ञेयता ( महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) महालेखापाल -१ ) लेखा परिक्षा ( महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९) निवड नस्ती, कार्यासन ग्रासं-३